**शासकीय कामकाजात संदेस ( Sandes ) इन्स्टंट मेसेजिंग ॲपचा वापर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक- संकीर्ण -२०२४ /प्र.क्र. ४७/र.व का १**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २६ जुलै, २०२४.

**प्रस्तावना-**

केंद्र शासन आणि राज्य शासन , शासकीय कार्यालये व स्थानिक संस्थांमध्ये हजारो संदेश आणि संप्रेषणांची देवाणघेवाण होते. हे संदेश प्रामुख्याने मजकूर स्वरूपात असले तरी, ऑडिओ/व्हिडिओ क्लिप आणि नस्ती इत्यादींमधील माहितीचीदेखील सुरक्षितपणे देवाणघेवाण होत असते. संदेस ॲप हे डिजिटल इंडिया कार्यक्रमांतर्गत आत्मनिर्भर भारताचा एक उपक्रम असून शासन ते शासन- G २ G ( Govt.to Govt. ) आणि शासन ते नागरिक G २ C ( Govt.to Citizen ) संप्रेषण/संदेश सुलभ करण्यासाठी मुक्त स्रोत आधारित, सुरक्षित आणि स्वदेशी इन्स्टंट मेसेजिंग प्लॅटफॉर्म देणारी प्रणाली आहे. संदेस ही सुरक्षितपणे शासकीय पायाभूत सुविधांवर आधारित प्रणाली आहे. तिचे धोरणात्मक नियंत्रण शासनाकडे आहे. संदेस ॲप हे गुगल प्ले स्टोअर आणि ॲपल ॲप स्टोअरवर कोणालाही डाउनलोड करण्यासाठी उपलब्ध आहे.

संदेस ( Sandes ) ॲप हे Play/App Store वर प्रकाशित झालेल्या डेटा गोपनीयता आणि डेटा धारणा धोरणाद्वारे ( Data Privacy and Data Retention Policy ) नियंत्रित केले जाते. संदेस ( Sandes ) ॲप हे " सुरक्षा प्रथम" तत्त्वावर आधारित आहे आणि त्याद्वारे संदेश पाठविणारा व प्राप्त करणारा यांच्यामध्येच ( एंड टू एंड एन्क्रिप्टेड ) संदेशवहन प्रदान करते. संदेस ( Sandes ) प्लॅटफॉर्म केवळ सांख्यिकीय विश्लेषणासाठी मेटाडेटा संग्रहित करतो आणि म्हणून प्रत्यक्ष संदेश पुनरुत्पादित केला जाऊ शकत नाही. सर्व वितरित न झालेले संदेश एन्क्रिप्टेड स्वरूपात केवळ मर्यादित कालावधीसाठी साठवले जातात. कोणत्याही गैरवापराची तक्रार झाल्यास गैरवापराचा उगम शोधण्याची संदेस ( Sandes ) ॲपमध्ये क्षमता आहे.त्यामुळे शासकीय कामकाजासाठी इतर कोणत्याही ॲपचा वापर न करता "संदेस" या NIC ने तयार केलेल्या ॲपचा वापर करणे बंधनकारक करण्याबाबतचे परिपत्रक निर्गमित करणे विचाराधीन होते.

**शासन परिपत्रक-**

संदेस (Sandes) ॲप हे इन्स्टंट मेसेजिंग प्लॅटफॉर्मची सर्व सुविधा प्रदान करते. याव्यतिरिक्त, संदेस (Sandes) ॲपची शासकीय वापरासाठी अधिक उपयुक्त ठरतील अशी वैशिष्ट्ये खालीलप्रमाणे आहेत-

१.संदेश सुरक्षितपणे पाठवणे व प्राप्त करणे, सुरक्षित साठवण, ओटीपी पाठवणे व वितरित न झालेला Data सुरक्षित ठेवणे.

२. शासन/शासकीय कार्यालये यांच्या गरजेनुसार अनुकूलित ( Customization ) करण्याची सुविधा.

३. एनक्रिप्टेड मेसेज आणि फाइल्स पाठवण्यासाठी eGov ॲप्लिकेशन्ससह सेवा आधारित एकीकरण.

४. अनौपचारिक आणि अधिकृत गट तयार करण्याची सुविधा.

५. SMS च्या ऐवजी ओटीपी, ॲलर्ट, सूचना व प्रसारण करणारी संदेस ही सुरक्षित व विनाशुल्क प्रणाली आहे.

६. सत्यापित आणि सार्वजनिक वापरकर्त्यांमधील पृथक्करण.

७. संदेस पोर्टलद्वारे शासकीय वापरकर्त्यांच्या पडताळणीचा पर्याय.

८. संस्थेच्या स्तरावर प्रोफाइल तपशिलांची दृश्यमानता लपविण्याची सुविधा.

९. शासनासाठी योग्य जिमोजी (शासकीय इमोजी) आणि टॅगसह डिझाइन केलेले संवाद.

१०. डेस्कटॉप/लॅपटॉपसाठी संदेस वेब आवृत्तीची उपलब्धता. ( sandes.gov.in)
११. संदेस पोर्टलवरून संस्थेतील विशिष्ट वापरकर्त्यांसाठी संदेश प्रसारणाची सुविधा.
१२. पोर्टलवरून भूमिका आधारित व्यवस्थापन आणि देखरेख.
१३. eGov ॲप्लिकेशन्समधून मेसेज आणि फाइल्स पाठवण्यास साहाय्य करते.
१४. ॲप्लिकेशन्समधून पाठवलेले संदेश आणि ते वाचल्याची पावती प्राप्त झाल्याची सुविधा प्रदान करते.
१५. एंड-टू-एंड एन्क्रिप्टेड ऑडिओ/व्हिडिओ कॉल्स (एकाबरोबर एक आणि सामाईक)
१६. एकात्मिक बाह्य अनुप्रयोगाद्वारे गट व्यवस्थापनाची सुविधा प्रदान करते.

२. NIC द्वारे विकसित करण्यात आलेल्या "संदेस" (Sandes) ॲपचा वापर केंद्र शासनातील सर्व अधिकारी/ कर्मचारी तसेच विविध राज्य शासनांमधील २०० हून अधिक शासकीय संस्था यांच्याकडून तसेच ३५० हून अधिक ई-गव्हर्नन्स ॲप्लिकेशन्समध्ये संदेश, सूचना व ओ.टी.पी. पाठविण्यासाठी केला जात आहे. सदर ॲपचे विविधांगी कार्य तसेच उपयोग विचारात घेता, महाराष्ट्र राज्य शासनामार्फतदेखील शासकीय कामकाजात राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र( NIC ) द्वारे विकसित करण्यात आलेल्या "संदेस" (Sandes) ॲपचा वापर करण्याबाबत सर्व विभाग व त्यांच्या अधीनस्थ शासकीय कार्यालयांना सूचना देण्यात येत आहेत.यासाठी शासकीय विभागांनी/कार्यालयांनी करावयाच्या बाबी खालीलप्रमाणे आहेत-

१) sandes.gov.in/download या संकेतस्थळावर जाऊन organisation onboarding फॉर्म डाऊनलोड करून त्यावरील माहिती व्यवस्थित भरावी.
२) सदर फॉर्मची Document copy आणि Scanned copy, hod.sandes_mhsc@nic.in या ई-मेलवर सक्षम प्राधिका-यांच्या शासकीय ई-मेलवरून पाठविण्यात यावी.

३. सदर सूचना या आदेशाच्या दिनांकापासून त्वरित अमलात येतील.

४. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७२६१६२०२२६८०७ असा आहे. हे आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK RAMCHANDRA REDEKAR

Digitally signed by ASHOK RAMCHANDRA REDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=192642fde64ff77d80e06a6ae786ae3c617eb03088b459dd9ff4138fca1b9ad8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6DFDC37B68ED4F0139080E387CBD563129A3A8EF7908E369425018B546EF526F, cn=ASHOK RAMCHANDRA REDEKAR
Date: 2024.07.26 16:35:23 +05'30'

**( अ. रा. रेडेकर )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य.
८. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१२. सचिव, राज्य निवडणूक आयोग, पहिला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२.
१३. मा. महाअधिवक्ता, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१५. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
१६. प्रबंधक, मा. मुंबई उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१७. प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, १ ला मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०००३२.
१८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, बँक ऑफ इंडिया इमारत, मुंबई-४०० ०२३.
१९. प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
२१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, राज्य सेवा हक्क आयोग, मुंबई.
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
२३. सर्व विभागीय आयुक्त.
२४. सर्व जिल्हाधिकारी.
२५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
२६. मंत्रालयाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख.
२७. भारतीय जनता पक्ष, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बराक नं.१, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-४०० ०२०.
२८. भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (इं.) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-४०० ०२५.
२९. राष्ट्रवादी कॉंग्रेस पक्ष, ठाकरसी हाऊस, जे.एन. हेरेडिया मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई-४०० ०३८.
३०. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०० ०२८.
३१. बहुजन समाज पक्ष, प्रदेश सचिव, महाराष्ट्र राज्य, बी.एस.जी.भवन, भूखंड क्र. ८३-ए, कलेक्टर कॉलनी, चेंबूर, मुंबई-४०० ०७४.
३२. भारतीय कम्युनिस्ट पक्ष, महाराष्ट्र समिती, ३१४, राजभवन, एस. व्ही. पटेल मार्ग, मुंबई-४०० ००४.
३३. भारतीय कम्युनिस्ट (मार्क्सवादी) पक्ष, महाराष्ट्र समिती, जनशक्ती सभागृह, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३.
३४. महाराष्ट्र नवनिर्माण सेना, राजगड, मातोश्री टॉवर, शिवाजी पार्क, दादर, मुंबई-४०० ०२८.
३५. निवड नस्ती (कार्यासन-र. व का. १), सामान्य प्रशासन विभाग.